**केंद्र शासनाचा माहितीचा अधिकार**
**<u>अधिनियम, २००५ च्या अंमलबजावणीबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्र.केंमाअ-२००५/प्र.क्र.२९३/०५/५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ६/९/२००५

**<u>शासन परिपत्रक</u> :-**

माहिती अधिकारासंदर्भातील केंद्र शासनाचा "माहितीचा अधिकार अधिनियम, २००५" दि.१५.६.२००५ पासून लागू झाला असून त्यातील काही तरतूदी त्याच दिनांकापासून म्हणजेच दि.१५.६.२००५ पासून अंमलात आल्या आहेत. उर्वरित सर्व तरतूदींसह हा अधिनियम दि.१२.१०.२००५ पासून अंमलात येणार आहे.

२. दि.१५.६.२००५ पासून अंमलात आलेल्या तरतूदींनुसार या अधिनियमाची अंमलबजावणी करण्याकरीता सहाय्यक शासकीय माहिती अधिकारी, शासकीय माहिती अधिकारी व अपीलीय प्राधिकारी हे १०० दिवसांच्या आत पदनिर्देशित करणे आवश्यक आहे. त्यानुसार आवश्यक त्या सूचना या विभागाच्या क्र.केंमाअ-२००५/प्र.क्र.१९०/०५/५, दि.६.८.२००५ च्या शासन परिपत्रकान्वये सर्व संबंधितांना देण्यात आल्या आहेत व त्यासोबत सदर अधिनियमाची प्रत सुध्दा पाठविण्यात आली आहे. दि.६.८.२००५ च्या परिपत्रकान्वये राज्य शासनाच्या अधिनियमानुसार ज्या स्तरापर्यंत शासकीय माहिती अधिकारी व अपीलीय प्राधिकाऱ्यांच्या नियुक्त्या करण्यात आल्या आहेत त्याच स्तरापर्यंत केंद्र शासनाच्या अधिनियमाच्या अंमलबजावणीकरीता आवश्यक त्या नियुक्त्या करण्यात याव्यात अशा सूचना देखील देण्यात आल्या आहेत. त्यानुसार सर्व संबंधितांनी केंद्र शासनाच्या अधिनियमातील कलम ५(१) व (२) आणि १९ मधील तरतुदींचा उल्लेख करुन सुधारित आदेश निर्गमित करणे आवश्यक आहे.

३. तथापि, काही मंत्रालयीन विभागांकडून मंत्रालय स्तराकरीता राज्य शासनाच्या महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२ चा उल्लेख करुन सहाय्यक माहिती अधिकारी / माहिती अधिकारी / अपिलिय प्राधिकारी यांच्या नियुक्त्यांचे आदेश निर्गमित केल्याचे निदर्शनास आले आहेत. त्यामुळे हे आदेश चूकीचे ठरतात. त्यांनी आवश्यक ती शुध्दीपत्रके काढण्याची कार्यवाही तत्काळ करावी.

४. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन सर्व संबंधितांना या परिपत्रकान्वये पुन्हा सूचित करण्यात येते की, केंद्र शासनाच्या अधिनियमातील तरतूदींचा कलम ५(१) व (२) आणि १९ योग्य उल्लेख करुन सहाय्यक शासकीय माहिती अधिकारी, शासकीय माहिती अधिकारी व अपीलीय प्राधिकारी यांच्या नियुक्त्या करणारे सुधारित आदेश निर्गमित करुन त्या आदेशांच्या २ प्रती फ्लॉपीसह या विभागास व सचिव, माहिती व तंत्रज्ञान यांना उपलब्ध करुन देण्याची विनंती करण्यात येत आहे.

तसेच प्रत्येक मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व क्षेत्रिय कार्यालयांत या नियुक्त्या विहित कालावधीत केल्या जातील याची दक्षता घ्यावी. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व क्षेत्रिय कार्यालयात करण्यात आलेल्या नियुक्त्यांची **एकत्रित माहिती** देखील या विभागास व सचिव, माहिती व तंत्रज्ञान यांना फ्लॉपीवर उपलब्ध करुन द्यावी.

५. केंद्र शासनाच्या अधिनियमातील तरतुदींनुसार या सर्व नियुक्त्या दि.२१.९.२००५ पूर्वी होणे आवश्यक असल्याने या नियुक्त्या विहित कालावधीत करण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

६. अधिनियमातील कलम ४(१) (अ) व (ब) नुसार १७ बाबींवरील व अन्य काही मुद्यांवरील माहिती विहित कालावधीत प्रसिध्द करावयाची आहे. त्यास अनुसरुन यशदा, पुणे या संस्थेने समान आदर्श पुस्तिका तयार केली आहे. त्याच्या प्रती या परिपत्रकासोबत सर्व मंत्रालयीन विभागांना पाठविण्यात येत आहेत. या पुस्तिकेतील नमुन्यात सर्व विभागांनी त्यांची माहिती दि.२१.९.२००५ पर्यंत प्रसिध्द करण्याची दक्षता घ्यावी. तसेच सर्व मंत्रालयीन विभागांनी यशदाकडून उपलब्ध झालेल्या या पुस्तिकेच्या प्रती त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालय प्रमुख / विभाग प्रमुख यांना त्वरित उपलब्ध करुन द्याव्यात व त्यांची माहिती सुध्दा विहित कालावधीत प्रसिध्द केली जाईल याची दक्षता घ्यावी. यशदाकडून प्राप्त झालेल्या समान आदर्श नमुन्याची पुस्तिका या विभागाच्या वेब साईटवर (www.maharashtra.gov.in --> home page ---> gad) प्रसिध्द करण्यात आली आहे.

७. केंद्र शासनाच्या अधिनियमाच्या अंमलबजावणीसंदर्भात या विभागाकडून निर्गमित करण्यात आलेल्या दि.१८.६.२००५, दि.६.८.२००५ व दि.१८.८.२००५ च्या शासन परिपत्रकांच्या प्रती व केंद्र शासनाचा अधिनियम देखील या विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आलेल्या आहेत याकडेही लक्ष वेधण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

स्वाक्षरी/-
(सत्यबीर एस.डोड)
शासनाचे प्रधान सचिव

**प्रत :-**

१) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव,
२) सर्व मंत्रालयीन विभाग,
३) सर्व विभागीय आयुक्त,
४) सर्व जिल्हाधिकारी / सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
५) सर्व महानगरपालिका आयुक्त,
६) निवड नस्ती. (२ प्रती)